यवतमाळ वनवृत्तातील ६ राजपत्रित व ६ अराजपत्रित अस्थायी पदे दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यत पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय, क्रमांक :- एफएसटी-०४/१६/प्र.क्र.१३६/फ-४**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- १४ ऑक्टोबर, २०१९.

**वाचा** :- १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र.कक्ष-३/यो/प्र.क्र.१/१६-१७/१०५८/१७-१८, दि.३०.०९.२०१९.

२) शासन निर्णय क्र.एफएसटी-०४/१६/प्र.क्र.१३६/फ-४, दि.११.०३.२०१९.

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९.

४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि -२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९.

**शासन निर्णय :-**

यवतमाळ वनवृत्तातील ६ राजपत्रित व ६ अराजपत्रित अशा एकूण १२ (बारा) अस्थायी पदांना दि.०१.०३.२०१९ ते दि.३०.०९.२०१९ पर्यत संदर्भ क्रमांक-२ येथील शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. यवतमाळ वनवृत्तातील १२ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ अन्वये शासनास सादर केला आहे.

३. उक्त परिस्थितीत यवतमाळ वनवृत्तातील १२ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. सदर मंजूरी वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९ मधील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे. वित्त विभागाने सदर शासन निर्णयामध्ये दिलेल्या निर्णयानुसार विहित कालावधीत कार्यवाही करावी. सदर मुदतवाढ महसूल व वन विभागाने संदर्भाधिन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या पदांचा समावेश आहे, या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. सदरहू पदावर होणारा खर्च हा खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व त्याखालील सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षात मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**यवतमाळ वनवृत्त कार्यालयातील १२ पदे**

| | |
|---|---|
| **प्रधान शीर्ष** | २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) |
| **उपप्रधान शीर्ष** | ०१ वनीकरण |
| **गौण शीर्ष** | ००१ संचालन व प्रशासन |
| **उपगौण शीर्ष** | ०१ संचालन व प्रशासन (०१) (०२) प्रादेशिक वनसंरक्षक (२४०६ ००४२) ०१ वेतन |

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९ मधील तरतुदीनुसार विभागास असलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१४१७५६११४८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सोबत :- विवरणपत्र "अ"**

Babasaheb S. Shinde

Digitally signed by Babasaheb S. Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1706e7b903eb05a5f1c405f3795499452af658b876e10b223a0cef893b6b6689, cn=Babasaheb S. Shinde
Date: 2019.10.14 17:57:01 +05'30'

**(बा.सि.शिंदे)**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति:-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१/२ मुंबई/नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) सर्व अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) मुख्य वनसंरक्षक(प्रा.), यवतमाळ वनवृत्त, यवतमाळ.
५) विभागीय वन अधिकारी, अकोला वन विभाग, अकोला/यवतमाळ वन विभाग, यवतमाळ/ पुसद वन विभाग, पुसद/पांढरकवडा वन विभाग/बुलढाणा वन विभाग, बुलढाणा.
६) ब-१ कार्यासन, फ-२ कार्यासन, फ-८ कार्यासन, फ-७ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) निवडनस्ती, फ-४ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक:- एफएसटी-०४/१६/प्र.क्र.१३६/फ-४,**

**दि.१४.१०.२०१९**

**विवरणपत्र "अ"**

**यवतमाळ वनवृत्तातील २०१९-२०२० मध्ये दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यत पुढे चालू ठेवण्यात आलेली राजपत्रित व अराजपत्रित अस्थायी पदांची यादी**

| अ. क्र. | कार्यालयाचे नाव व पदांचे नाव आणि वेतनश्रेणी | अस्थायी पदांची संख्या | स्तंभ क्रमांक ३ मधील पद/ पदे ज्या शासकीय आदेशान्वये निर्माण केली त्या आदेशाचा क्रमांक आणि दिनांक | स्तंभ क्र. ३ मधील पद/पदे २०१७-२०१८ यावर्षी ज्या शासकीय आदेशान्वये पुढे चालू ठेवली होती त्याचा क्रमांक आणि दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **मुख्य वनसंरक्षक (प्रा.) कार्यालय, यवतमाळ** | | | | |
| १ | मुख्य वनसंरक्षक | १ | शा.नि.क्र.एफडीएम-१८८०/फ-४ दि.२९.८.१९८३ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.१३६/फ-४, दि.११.०३.२०१९ |
| २ | विभागीय वन अधिकारी | २ | शा.नि.क्र.एफडीएम-१८८०/फ-४ दि.२९.८.१९८३ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.१३६/फ-४, दि.११.०३.२०१९ |
| ३ | उपवन अभियंता | १ | शा.नि.क्र.एमएफएस-१००९/७३१/ प्र.क्र.१३३/फ-८ दि.२६.९.२०११ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.१३६/फ-४, दि.११.०३.२०१९ |
| ४ | सहाय्यक वनसंरक्षक | १ | शा.नि.क्र.एमएफएस-१००९/ ७३१/ प्र.क्र.१३३/फ-८ दि.२६.९.२०११ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.१३६/फ-४, दि.२४.१०.२०१८ |
| ५ | मुख्य लेखापाल | २ | शा.नि.क्र.एमएफएस-१००९/ ७३१/ प्र.क्र.१३३/फ-८ दि.२६.९.२०११ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.१३६/फ-४ दि.११.०३.२०१९ |
| ६ | वरिष्ठ सांख्यिकी सहाय्यक | १ | शा.नि.क्र.एमएफएस-१००९/ ७३१/ प्र.क्र.१३३/फ-८ दि.२६.९.२०११ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.१३६/फ-४, दि.११.०३.२०१९ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ७ | सहायक वनसांख्यिकी | १ | शा.नि.क्र.एमएफएस-१००९/ ७३१/ प्र.क्र.१३३/फ-८ दि.२६.९.२०११ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.१३६/फ-४, दि.११.०३.२०१९ |
| ८ | दप्तरी | १ | शा.नि.क्र.एमएफएस-१००९/ ७३१/ प्र.क्र.१३३/फ-८ दि.२६.९.२०११ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.१३६/फ-४, दि.११.०३.२०१९ |
| **पांढरकवडा वन विभाग** | | | | |
| ९ | उपवनसंरक्षक | १ | शा.नि.क्र.एमएफएस-१००९/ ७३१/ प्र.क्र.१३३/फ-८ , दि.२६.९.२०११ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.१३६/फ-४, दि.११.०३.२०१९ |
| १० | दप्तरी | १ | शा.नि.क्र.एमएफएस-१००९/ ७३१/ प्र.क्र.१३३/फ-८, दि.२६ .९.२०११ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.१३६/फ-४, दि.११.०३.२०१९ |

***************